**महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने राज्य शासना विरोधात थकहमीच्या रकमा मिळण्याबाबत मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या सिव्हिल अपील क्र. ३४४५/२०११ च्या अनुषंगाने कार्यवाहीस्तव सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था म.रा. पुणे यांच्या अधिपत्याखालील अपर निबंधक दर्जाच्या अधिकाऱ्याची महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेमध्ये प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग,**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण १२२१/ प्र.क्र. १५३/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २३ डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने राज्य शासना विरोधात थकहमीच्या रकमा मिळण्याबाबत मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या सिव्हिल अपील क्र. ३४४५/२०११ बाबत करावयाच्या कार्यवाहीसंदर्भात अनुषंगाने मा. उपमुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि. ९.९.२०२० रोजी झालेल्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था म.रा. पुणे यांच्या अधिपत्याखालील अपर निबंधक दर्जाच्या अधिकाऱ्याची महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता सदर प्रस्तावावर साकल्याने विचार करुन शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेने राज्य शासना विरोधात थकहमीच्या रकमा मिळण्याबाबत मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या सिव्हिल अपील क्र. ३४४५/२०११ बाबत करावयाच्या कार्यवाहीसंदर्भात राज्य शासन व महाराष्ट्र राज्य सहकारी बँक यामध्ये योग्य समन्वय राखावयाच्या दृष्टिकोनातून शासनाने आता असा निर्णय घेतला आहे की, सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिपत्याखालील अपर निबंधक (सहकारी संस्था) या दर्जाच्या अधिकाऱ्याची राज्य सहकारी बँकेवर प्रतिनियुक्तीने पूर्ण वेळ नियुक्ती करण्यात यावी .

सदर अधिकाऱ्यामार्फत मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या सिव्हिल अपील क्र. ३४४५/२०११ च्या आदेशाच्या अनुषंगाने बँकेद्वारे करण्यात आलेल्या / येत असलेल्या कार्यवाहीचे संपूर्ण संनियंत्रण करावे.

महाराष्ट्र राज्य सहकारी बँक ही राज्यातील कृषी पतपुरवठ्याच्या त्रिस्तरीय रचनेतील शिखर संसथा असून राज्यातील जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांना नाबार्डकडील विविध योजनांतर्गत शेती कर्जासाठी फेर कर्जपुरवठा करणे तसेच विविध विषयांवर मार्गदर्शन करणे, विशेष तज्ज्ञांचा सल्ला/ सेवा उपलब्ध करुन देणे(उदा. सरकारी रोख्यांमधील गुंतवणूक, संगणकीय प्रणाली अद्यावतीकरण, आर्थिक अडचणीमधील जि.म.स. बँकांचे व्यवस्थापन इ.) प्राथमिक कृषी पतपुरवठा संस्थांच्या संगणकीकरणासाठी तांत्रिक सेवा व वित्तीय सहाय्य उपलब्ध करुन देणे या सारख्या महत्वाच्या बाबींसंदर्भात शासन / सहकार आयुक्त यांनी वेळोवेळी राज्य सहकारी बँकेस दिलेल्या निर्देशांचे बँकेमार्फत पालन होण्याच्या अनुषंगाने संनियंत्रण करणे तसेच या संदर्भात राज्य शासन तसेच सहकार आयुक्तालय यांचेकडून वेळोवेळी देण्यात आलेल्या निर्देशांचे पालन करणे व अशा स्वरुपाची तदनुषंगिक कामे करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२११२२३१६०५१२४९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Shrikrushna Anandrao Wadekar

Digitally signed by Shrikrushna Anandrao Wadekar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7305071c9d8b281074f8452b1a671851b99ce164d8bd282bfeb775611d0eb87e, pseudonym=A9B19E68D73171B69896843593789CD99AC6DBD5, serialNumber=2711D1231BE138057C3C88E0EFB4B1CD5177AA9E3C71FCD2EDF6EC025114EB89, cn=Shrikrushna Anandrao Wadekar
Date: 2021.12.23 16:05:38 +05'30'

**( श्रीकृष्ण वाडेकर )**
**विशेष कार्य अधिकारी व सहनिबंधक ,**
**सहकारी संस्था, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) समन्वयक, राज्यस्तरीय बँकर्स समिती, बँक ऑफ महाराष्ट्र,पुणे.
४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे

**प्रत आवश्यक कार्यवाहीस्तव**

१) उपसचिव (५-स), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२) अध्यक्ष, प्रशासकीय मंडळ, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक लि. मुंबई
४) निवडनस्ती